# देव-कन्या

कविः-
श्री. रा. देव
उस्मानाबाद

मूल्य रु. १-४-०





## -: अर्पण-पत्रिका :-

स्वतंत्र निजदेश हो म्हणुनि वाहती जीवन
सुधन्य म्हणती अशा सुजनजीवना, जीवन
सजीवकृत देहही, तिळभरीहि ज्या, जीव, न
अशा सु-पुरुषा मुदें करित देव-कन्यार्पण

धाराशिव                         कविः— श्री. रा. देव.



# प्रस्तावना

निद्रित समाजास जागृत करण्याची धुरा अलीकडील काळांत वर्तमानपत्रें, प्रचारक, व्याख्याते इत्यादींनीं उचलून धरली असली तरी त्या आधीं या कामाची धुरा वाहणारे समाजांतील निराळ्या संप्रदायाचे लोक असत आणि त्यांत मुख्यत: भरणा कीर्तनकारांचा, प्रवचनकारांचा, कवींचा आणि शिक्षकांचा असे. श्रीयुत देव हे कीर्तनकार म्हणून उदयास आले, कवि म्हणून प्रसिद्धि पावले आणि शिक्षक म्हणून त्यांनीं वृत्ति अंगिकारिली अर्थात् श्री. देवांमध्यें या त्रिपदा गायत्रीची भासमानता, त्रिवेणी संगमाची शुचिता आणि त्रिदलाची मंगलता सहजगत्याच आली आहे. केवळ एक कवि या नात्यानें त्यांच्या कविता-संग्रहास पाहणें युक्त नव्हे तर एक कीर्तनकार कवि, एक शिक्षक कवि या नात्यानें त्यांचा प्रसिद्ध होत असलेला कविता-संग्रह पाहणें अधिक उचित होईल. श्री. देव यांच्या कवितेंत कधीं प्रचारकी थाट दिसून येईल तर कधीं स्वानुभवामुळें हृदयाचीं स्फुर स्फुंदनें नि स्पंदनें आढळून येतील. समाजांतील रूढ चालीरीतींतून स्पष्ट होणारी बोधपरता त्यांनीं ग्रहण केल्याचें दिसून येईल तर त्याज्य चालीरीति दूर करून ग्राह्य कोणत्या यांचें मार्गदर्शनहि तेथें दिसून येईल. त्यांचा पिंड सनातनी असल्यामुळें सनातनी वृत्तीचे दर्शन त्यांच्या कवितांतून आढळेल तर सुधारकी वातावरणाचें कांहीं संस्कार त्यांच्या मनावर होत गेल्यामुळें सनातनी संक्रांतीच्या ऐवजीं सुधारकी संक्रांत कशी असूं शकेल हेंहि ते सांगत आहेत असें दिसून येईल. मराठवाड्यांतील नांदेड, उस्मानाबाद, तुळजापूर, परभणी, औरंगाबाद, कळंब त्याचप्रमाणें पुणें, मुंबई, हैद्राबाद अित्यादि ठिकाणीं त्यांचें कविता-गायन आणि कीर्तन ऐकलेलें पुष्कळ लोक आहेत. स्वत:च्या कीर्तनाख्यानांतून स्वत:च्या गेय कविता व श्लोक त्यांनीं म्हटलेले आहेत आणि या त्यांच्या कविता प्रसंगविशेषानुरूप त्यांच्या सुरेल गायकीमुळें कशा उठावदार व परिणामकारी वाटल्या याचें प्रत्यंतरहि पुष्क-

ळांना आलेलें असेल. आज त्यांच्या स्फुट कवितांचा हा संग्रह प्रसिद्ध होत असल्यामुळें पुष्कळशा पूर्वकालीन श्रोतेगणांची स्मृति जागृति खचित होईल। तर नवीन वाचकांना त्या त्या कवितकाव्य गुणावरून आस्वादावयास मिळतील. असा हा ३३ कवितांचा सग्रह स्वागतार्ह ठरावा अशी अपेक्षा आहे.

एखाद्या पुस्तकाची प्रस्तावना म्हणजे परीक्षणहि नव्हे आणि रसग्रहणहि नव्हे. पण प्रस्तावनेंत हीं दोन्हीं अंगें असू शकतात आणि असत नसतात! कविता म्हटली कीं रसग्रहण आलेंच आणि रसग्रहण म्हटलें कीं त्यास निकष कोणता हा प्रश्न आलाच वस्तुत: कवीला कविता स्फुरत असतां किंवा काव्य–स्फूर्ति होत असतां तो निकषाची थोडीच पर्वा करीत असतो? फुलांनीं उमलावें आणि फुलावें एवढेंच त्यांना माहीत! तीं शोभेचीं आहेत कीं वासाचीं आहेत, त्यांचें अत्तर किती निघू शकेल, तें केश–कपालावर खुलून दिसेल कीं बटन्–होलमध्यें उमदें दिसेल, त्याची उपयुक्तता किती या गोष्टी फुलाला माहीत नसतात. उपयोग करून घेणाऱ्यानें त्याचा योग्य तो उपयोग करून घ्यावा. कवीचे देखील असेंच! त्याच्या निर्व्याज, शीघ्रसंवेदक अंत:पटलावर बाह्यजगाचे संस्कार होत असतात आणि स्वानुभवाचे उद्‌गार शक्य तेवढ्या सुश्लिष्ट पद–बंधद्वारां तो प्रकट करीत असतो. कवीच्या मन:स्थितींत जाऊन त्याचें सुख वा दु:ख अनुभवानें किंवा त्यापासून दूर रहावें हें श्रोत्यांचें नि वाचकांचें काम! कवितेंत भावुकता असावी, त्यांत कल्पना–वैभव असावें, भाषा–सौंदर्य दिसावें, वर्णन–शैली मनोरम असावी, यथोचित अलंकार असावे, सूचकता असावी, रम्यता असावी, इत्यादि निरनिराळे निकष लावून एखादें काव्य पारखून पाहण्यांत येतें. अर्थात् उत्तम काव्याचें लक्षण पाहूं जाता हे निकष योग्य आहेत असेंहि वाटतें.

प्रस्तुत काव्य–संग्रहांत ओज, प्रसाद, माधुर्य आदि काव्यगुणांची झांक दिसून येईल तर अर्थालंकारांतील कांहीं अलकार उदाहरणार्थ, उपमा, रूपक, दृष्टांत आणि अर्थांतरन्यास व श्लेष हे आवडीचे व नित्याच्या

वापराचे अलंकार या देवकन्येनें निवडून परिधान केले असावेत असें वाटतें. कवीची भाषा डौलदार व संस्कृत शब्द प्राचुर्यामुळें जुन्या वळणाची वाटते. कवितेंतील कवि संकेत सुपरिचित वाटतात. नवकाव्यांतील संकेत येथें दिसून येणार नाहींत. आख्यानपर वा प्रचारकी थाटाच्या कवितेंत जो कला–संयम प्राय: नसतो तो येथेंही क्वचित प्रसंगीं आढळतो. कवीचें मन मात्र तीव्र भावनावश आणि शीघ्र संवेदनक्षम असावें असें वाटतें. हिंदूसंस्कृति, हिंदुधर्म, हिंदु परंपरा यांचा अभिमान कवितेंतून पदोपदीं दिसून येतो. कवितांच्या चाली लावण्याचे प्रयास नव–काव्यांतून करावे लागतात तो अडथळा या ठिकाणीं नाहीं. साधीं जाति–वृत्तें साध्या गेय चाली असल्यामुळें कोणतीहि कविता गेय नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. शब्दसौष्ठव आणि अर्थगांभिर्याच्या दृष्टीनें कित्येक कविता हृद्य आहेत.

प्रस्तुत संग्रहाच्या आरंभीं श्रीगणेश–वंदन केलें आहे. कवीचें आडनांव ‘ देव ’ असल्यामुळें आपल्या या नांवाचा उपयोग येथें व अन्यत्र श्लेषालंकारानें योग्यपणें झाला आहे. शेवटची कविता शारदावंदन अशी आहे. ‘ लोकसत्ताक दिन ’ या कवितेंत कवीला भारतभूच्या पारतंत्र्याचा आलेला कंटाळा व वीट नष्ट झाला असून लोकसत्ताक दिनानिमित्त मोठ्या आनंदानें यमन रागांत हें मंगलाष्टक रचलें आहे. ‘बघूनि विपरीत हें तिळ न चालते मन्मती’ या कवितेंतील डौल आणि पदरचना पहाण्यासारखी आहे. उदाहरणार्थ:—

श्लोक २ रा ‘असाधु उदयाचलीं सुजन तो रसाध:स्थलीं
कृतांत बवला जरा तरुण मस्तकी या कली ।
परांस शिरिं घेऊनी स्वजन वैर आरंभिती
बघून विपरीत हें तिळ न चालते मन्मती ’।। किंवा

श्लोक ६ वा जरी निघत शीतसें उदक शीतला पासुनी
परी उदय पावते जलदिं उष्ण सौदामिनी ।
शिला द्रव न पावते परि पहा नद्या जन्मती
बघून विपरीत हें तिळ न चालते मन्मती ’।।

आठव्या कवितेंत 'कवि' या शीर्षकाच्या कवितेंत कवि कसा असतो हें सांगितलें आहे. तुकारामांनीं हरिदास किंवा विष्णुदास कसा असतो हें स्वत:च कथन केलें आहे. किंवा रामदासांनीं कवि-महिमा वर्णन केला आहे त्याप्रमाणेंच या कवीनें म्हटलें आहे की,

बनूनि नृपति स्वयें नृपतिच्या वचां बोलतो
कृपाण करिं घेउनी समरकर्म आरंभितो ।
शिरीं धरुनि सारिका समुद तो कधीं नाचतो
कवीसम जगत्रयी बहुरूपी असे कोण तो ! ॥ किंवा
नको संवगडी नको रुचिर वा नको भोजन
सुवर्णमय पात्र त्या गमत मृत्तिका-भाजन ।
त्रपा त्यजुनि नित्य तो निजवधू सवें क्रीडतो
कुणी न कवि सारखी विमल भावना ठेवतो ॥

कलंकित चंद्रास, लतिका-वियोग अित्यादि कविता वाचनीय आहेत. गुलाबास आणि जन्मांध या कवितेवर The Last Rose of Summer and The Blind Boy या अिंग्रजी कवितांचा परिणाम झाला आहे तर 'मत्सर' या कवितेवर संस्कृत सुभाषितांचा परिणाम दिसून येतो. 'तुलना' ही कविता एक उत्कृष्ट भाव-गीत आहे. भावनाचा उद्रेक आणि प्रसाद दोन्हींचा मनोहर संगम येथें दिसून येतो. सुभाषबाबूंना 'प्रणाम' या कवितेंत सुभाषबाबू, सावरकर, टिळक, महात्माजी आणि श्री. जवाहरलाल यांच्या-संबंधीं कवि-मनास वाटत असणारें आदरयुक्त प्रेम स्पष्टपणें व्यक्त झालें आहे. 'विविध चित्रें' या कवितेंत श्रीरामचंद्रांचें गुणगान, भीष्माचार्यांचा दृढनिश्चयीपणा आणि शिवाजी महाराजांचें थोर चारित्र्य यांचें वर्णन आहे. कांहीं कविता बऱ्याच लांब आणि वर्णनपर आहेत. बऱ्याच कविता भाव-गीतांसारख्या लहान आणि सुटसुटीत आहेत. अर्थान्तरन्यास, सामान्य सिद्धांत आणि दृष्टांत हे अलंकार पुष्कळ ठिकाणीं आढळतात. उदाहरणार्थ 'गरीब गुराखी' या कवितेंतील अनुस्यूत तत्त्व 'ज्यासी तारी देव तयासी कोण जगी मारी । कितिही प्रहार केले तरी' किंवा 'थोर कोण ?" या कवितेंत 'होय जगती संपदाही । दो दिसांची सावली ॥' किंवा 'भाग्य-

काली नम्र होतो । थोर म्हणती त्यासही ।। तसेंच सिंह कधी कां काक-मुखिचें मांस शिळें खाय?' 'स्वतंत्रतेचा आनंद' या कवितेवर Longfellow च्या ' The Slave's Dream ' या कवितेची छाप असली तरी वर्णनांत नाविन्य आहे. पुढील अनुप्रास पहा :-

निसर्ग-निर्मित निर्जिव नाना वनस्पति थोर ।
अेकवटूनी निनाद करिती आनंदे फार ।। तसेंच
स्वतंत्रतेच्या स्वानंदानें सौख्य सदा होतें ।
परिस-पंजरी परकीयांची पीडा परि देते ।।

"लतिका-वियोग'

या भावगीतांत चेतनगुणारोप फार प्रकर्षानें साधला आहे, आणि शेवटच्या चार ओळींत दिलेली कलाटणी परिणामकारी आहे. 'कलंकित शूद्रास' या कवितेंत कवी चंद्रास म्हणतो:-

शोभे जेवि न वस्त्रभूषण युता सौभाग्य हीनांगना
विद्वन्मान्य तसा कितीहि असला शोभे न शीलाविना ।।
आहे शुद्ध जसा वरूनि तसला होसी जरी अन्तरीं
नाहीं मोल गुणा तुझ्या मग मुळिं हे जाण चंद्रा तरी ।।

वर दाखविलेल्या स्थळांशिवाय कित्येक स्थळें उल्लेखनीय आहेत पण त्यांकडे अंगुलिनिर्देश करण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं. या कवितांच्या खालीं लेखनकाल दिला असता, तर कवीच्या लेखनाचा वेग अजमावतां आला असतां आणि वयोमानानुरूप कवितांच्या लेखनाचें वर्गीकरण आणि मानसशास्त्रीय पर्यालोचन करतां आलें असतें. पण तसें करण्यास येथें सवडच नाहीं. असो ! मराठवाड्यांतील प्रसिद्ध कवीच्या कवितांचीं पुस्तकें फार कमी प्रसिद्ध झालीं आहेत. श्री. देव यांच्या या पुस्तकाचें स्वागत थाटांत होवो हीच सदिच्छा.

**मु. मा. घाणेकर,**

असिस्टंट डायरेक्टर,
शिक्षणखातें.
( हैद्राबाद द. )

हैद्राबाद (दक्षिण)
दि. २१-५-५४.

# कवीचा अल्पपरिचय

मराठवाड्यांतील सुप्रसिद्ध कवि व कीर्तनकार श्री. श्रीधर रामकृष्ण देव यांचा जन्म इ.स. १९०० मध्यें झाला. लहानपणींच ९ महिन्यांचे असतांना यांचे वडिल निवर्तले; त्यामुळें त्यांचा व त्यांच्या मातुश्री श्री. मैनाबाई, एक बंधु व एक भगिनी या सर्वांचा प्रपंचाचा भार त्यांचे आजोबा वैयाकरणी पंडित वे. शा. सं. सखारामशास्त्री नाशिककर यांच्या अंगावर पडला. गरिबीमुळें देवांचें शिक्षण कसेंबसें मॅट्रिकपर्यंत औरंगाबाद येथील हायस्कूलमध्यें झालें. मॅट्रिकमध्यें संस्कृत व मराठी या विषयांत ते सर्वांत पहिले आल्यामुळें त्यांना ७५ रु. पारितोषिक मिळालें.

पुढें १९१९ ला मॅट्रिक पास होतांच ते उच्च शिक्षणासाठीं निझाम कॉलेज हैद्राबाद येथें गेले व शिकवण्या करून व वार लावून ते आपला अभ्यास करूं लागले.

पण येथेंहि त्यांच्या दैवानें त्यांना साथ दिली नाहीं. त्यांचे आजोबा कालवश झाले. त्यामुळें त्यांच्या सर्व प्रपंचाचा भार त्यांच्यावर पडला. त्यांचें शिक्षण सुटलें व त्यांना नोकरी धरावी लागली.

प्रथम नांदेड हायस्कूलमध्यें त्यांना १९२० ला शिक्षकाची नोकरी मिळाली. तेथेंच त्यांच्या अंगीं असलेला नैसर्गिक काव्यगुणवृक्ष, श्री. दे. ल. महाजन यांच्या सहवासानें फोफावूं लागला.

त्यांनीं तेथें श्री. महाजनांच्या नेतृत्वाखालीं एक कीर्तनसंस्थाहि स्थापन केली.

तेथें दर एकादशीला कीर्तन करण्याचा त्यांनीं परिपाठ ठेवला. त्यांचा आवाज गोड व काव्याचा नाद यांमुळें ते उत्तम कीर्तनकार कवि म्हणून नांवाजले. रंगदेवता त्यांच्या कीर्तनास हात जोडून उभी रहाते असें श्रोते म्हणतात.

नोकरी करूनच त्यांनीं बी. ए. पर्यंत शिक्षण घेतलें. प्रस्तावनेंत श्री. घाणेकर यांनीं लिहिल्याप्रमाणें ते कीर्तनकार, कवि व शिक्षक म्हणून प्रसिद्धीस आले. हे अत्यंत यशस्वी शिक्षक म्हणून प्रसिद्ध आहेत. विशेषतः मराठी काव्य शिकविण्यांत यांचा हात धरणारा क्वचितच. मराठी भाषेचा व हिंदु संस्कृतीचा यांना अत्यंत आदर व अभिमान आहे हें प्रस्तावना लेखक श्री. घाणेकर यांनीं व्यक्त केलें आहे.

ते सरकारी नोकर असून देखील व निझामाच्या राजवटींत रहात असून देखील हिंदूंवर झालेले अत्याचार व गळचेपी याविषयीं ते निर्भिडपणें आपल्या कीर्तनांतून विचार व्यक्त करीत असत. देशाविषयीं व धर्माविषयीं असलेली तीव्र तळमळ त्यांच्या काव्यांतून व कीर्तनांतून वारंवार दिसून येतें.

नांदेडहून त्यांचें स्थलांतर उस्मानाबाद येथें झालें व येथेंच त्यांच्या नोकरीचा बराचसा काल गेला. त्यांनीं प्रपंच करून स्वतःचें एक छोटेसें घरहि बांधलें. त्यास 'इंदिरा निवास' नांव दिलें. त्यांच्या अंगीं विद्वत्ता असूनहि निझामस्टेटमध्यें उर्दूच्या वर्चस्वामुळें हें रत्न राखेंत झांकलें गेलें होतें.

आतां कोठें स्वातंत्रप्राप्तीनंतर त्यांचा हा पहिला कवितासंग्रह 'देवकन्या' प्रसिद्ध होत आहे ही आनंदाची गोष्ट होय. ते लवकरच सेवानिवृत्त होत आहेत. यापुढें या 'इंदिरा निवासां'त श्री. व सरस्वति एकत्र नांदोत व वाढोत व अद्यापहि त्यांचा बराच अप्रसिद्ध काव्यग्रंथ व चरित्रात्मक आख्यानें लवकरच प्रसिद्ध होवोत व रसिकांचें रंजन करोत ही देवचरणीं प्रार्थना करून हा लांबलेला देवकवींचा परिचय येथेंच थांबवितों.

**भार्गवराव कवलगी,** बी. ए. बी. टी.

मुख्याध्यापक, हायस्कूल
मुरुम

स्थल मुरूम
जि. धाराशीव
दि. १५-८-५४.

# - निवेदन -



"देवकन्या" या काव्य-पुस्तकाचें प्रकाशन व्हावें ही इच्छा बऱ्याच अवधीनंतर का होईना फलद्रूप झाली ही देवकृपाच होय. सारें आयुष्य या निझाम स्टेटमध्यें घालविण्याचा प्रसंग आल्यामुळें ती राजवट असेपर्यंत तरी मराठी वाङमयाचा व त्यांतून काव्य-पुस्तकाच्या प्रकाशनाचा योग येणें जवळजवळ अशक्यप्रायच होतें. आतां कोठें मराठी भाषेला वर डोकें काढण्यास संधि मिळाली आहे. या सुवर्णसंधीचा फायदा घेऊन हें पुष्प रसिकांच्या पुढें ठेवलें आहे. रसिकच त्याचें कोडकौतुक कर-तील. आपली कन्या कितीहि कुरूप असली तरी ती चारित्र्यसंपन्न अशा थोरांच्या घरीं पडावी ही पित्याची अिच्छा असतेच. या न्यायानें माझ्या कन्येच्या गुणदोषांचा परीक्षेचा भार थोर रसिकांवरच सोंपविणें श्रेयस्कर होय.

या प्रकाशनाच्या कामीं ज्या ज्या सहृदय रसिकांनीं मला वेळोवेळीं तन, मन, धनें साहाय्य केलें त्यांचा उल्लेख करणें अत्यंत आवश्यक आहे. माझ्या घरीं विद्यार्थी या नात्यानें राहलेले श्री. रंगनाथराव परळकर यांनीं या काव्य-पुस्तकाच्या सुन्दर हस्तलिखित प्रति लिहिण्याचे श्रम घेतले, त्याचप्रमाणें श्री. शंकर सोनाजी कुलकर्णी, नगराध्यक्ष, धाराशिव यांनीं द्रव्य-साहाय्य केलें. श्री. सीतारामपंत पाटील व श्री. शेषराव कठारे यांनीं सहानुभूति दाखविली, श्री. ललितादासराव देशपांडे, मुख्या-ध्यापक, प्रशाला, परभणी यांनीं योग्य त्या सूचना दिल्या, अत्यंत कामाची निकड असतांहि, वेळांत वेळ काढून वाङ्मयतज्ज्ञ श्री. मुरलीधरराव घाणेकर M. A. Dip. Ed. असिस्टंट डायरेक्टर शिक्षणखातें हैदराबाद

यांनीं सुन्दर व समर्पक प्रस्तावना लिहून अुपकृत केलें व मुखपृष्ठावरील चित्र तयार करण्याचें काम रा. प्रभाकर जोशी यांनीं केलें. त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानणें माझें कर्तव्यकर्म ठरतें.

पुस्तक प्रकाशन करून, उत्तम छपाई, बाह्यांग व अंतरंग सुशोभित करून 'देवकन्ये'ला योग्य ते अलंकार घालून विभूषित केलें त्याबद्दल प्रेसचे चालक श्री. शं. बा. जोशी यांचे आभार मानून हें निवेदन पूर्ण करतों.

रसिकांनीं पुस्तकावरील आपले विचार पाठविल्यास त्याचाही स्वीकार केला जाईल.

लेखक

कवि:— **श्री. रा. देव**

धाराशिव



# अनुक्रमणिका

# श्रीगणेश-वंदन



माता जयाची सुता पर्वताची

पिता हो जयाचा प्रभू–शंकर

मांगल्य–मान्य त्रिलोकीं जयाचें

म्हणूनी जया सर्व जोडी कर

सत्कर्म निर्विघ्न व्हावें म्हणूनी

जया अग्रणीं मान देवांतरीं

सत्कीर्तनीं कां गणेशा नमाया

कधीं लाज वाटेल देवा तरी ?

# श्री शिवाजीची शतघ्नी

( टीप:–श्री शिवाजी महाराजांनीं जयसिंगास पाठविलेल्या पत्रांतील मजकूर या काव्यांत ग्रथित केला आहे. )

( चाल-चंद्रकांत राजा )

प्रणाम घ्यावा जयसिंगा ! तूं बाल शिवाजीचा
मार्ग दाखवो देव तुला तो धर्म–न्यायाचा
तुझ्यामुळेंची रजपूताचें शीर्ष उंच राहीं
रक्षाबंधन देश भगिनिचें तुझ्यावीण नाहीं
बाबरचीही राज्यलक्ष्मी दिमाख जो दावी
नटवेपण तें तुझ्या कपाळी कलंक हा लावी
कळली मजला वार्ता सिंहा धाडस कां करिसी
कलंक मुख तव दावाया मज, दक्षिणेस येशी
दक्षिण देशा सहज जिंकणें गोष्ट न ही साधी
साधी स्वहिता सोड वेड हे विचार कर आधी
हिंदूच्या या रक्तानें मी यशस्वी होईन
अपयश तुजला उलटे येइल ध्यानिं धरी खूण
स्वकीय नाशा तयार होशी असल्या कर्मांनी
दुष्कृत्यांच्या नादिं लागतां हो अपुली हानी
तुझ्याच केवळ स्वार्थाकरितां खटाटोप असला
केला असता आनंदानें प्रणाम मी तुजला
अश्व घेउनी तुझ्याचसाठीं पृथ्वी जिंकाया
रक्त सांडिलें असतें माझे, देश तुला द्याया
पण नीचा तूं नीचांचा जो अधिप त्यास मिळसी

सज्जन छलकां औरंगजेबा साह्य सुखे करिसी
हिंदुद्वेष्टच्या धर्म द्वेष्टच्या देशद्रोह्याशी
साह्य करोनी कारण होशी देशद्रोहासी
बलिष्ठ म्हणुनी सामिल व्हावे मर्दपणा काय ?
सिंह कधी कां काकमुखींचें मांस शिळें खाय ?
तरवारींचें पाणी माझ्या येऊनि दावावे
स्वकीय माझे मुकतिल प्राणा हे न मला भावे
आला असता स्वतः तुर्क जरी तो दक्षिणि लढण्याला
तरवारीचें असते पाणी पाजविले त्याला
कळलें जेंव्हा औरंगाजेबा, खानद्वय खपले
जयसिंगाला घ्यावे हातीं हेचि त्यास सुचले
मारा अमुचा सहन न होइल ठावे पूर्ण तया
म्हणूनि तुजला नियुक्त केलें, जयसिंगा, राया
परंतु तुजला कळे न इतुके कपट–कर्म त्याचे
म्हणूनि होशी सिद्ध कराया पारिपत्य अमुचें
हिंदु केसरी नष्टचि व्हावा मुसह्य तुजसिंगा
अविध कोल्ह्याचा मग बघशिल तो धांगाधिंगा
हीच राक्षसी प्रेरक शक्ती औरंगजेबाची
कळे न तुजला विबुधा कैसी रीति लुटायाची
व्याघ्र व्याघ्रता करितो सिंगा प्राण्यावर इतरा
सिंहासंगे गृह्युद्धाला ये न कधीं समरा
तरवारीच्या पाणीं तुझिया वाजी ही जोम
हिंदुद्वेष्टच्या म्लेंच्छासाठी बंद करी धाम
नामर्दांना युद्धीं जिंकुनि शौर्य गाजवीसी
प्रसंग पडतां माझ्या संगे अपयश पदरासी
तृषित प्राण्या धावसि प्याया मृगजल हें व्यर्थ

प्रयत्न असले विफलित होती मनीं जरी स्वार्थ
मृगनयना कुणी अतिप्रयासे गांठुनि आणावी
आणि शत्रुच्या स्वाधिन करुनि हीनत्वा दावी
नीचा पुढती मान लवविणें वीरा नच साहे
वीर तुला मी कसें म्हणावे मान ज्यास नोहे
बुंदेल्यानें, चंपतराये, सहाय्य अमित केलें
उपकाराचा बदला अपकारचि कां हे न प्रतिक ठरलें
ताताला जो तात न मानी टाकी बंदीत
भावांचें जो खून करोनी राज्य स्वत: घेत
स्वकीय मारी लोभास्तव जो काय पूज्य तुजला.
अकलेच्या कांद्या कां करिसी आत्मघात असला ?
मर्दपणाची चाड तुला तरि चालव तरवार
वार करोनी अधमावरि त्या करी त्वरे ठार
अपुले आपण वैरी होणें घात स्वहिताचा
देश अपुला धर्म अपुला विचार कर याचा
धर्मलोप हा होउं लागला, लाज धरी याची
हिंदुत्वाची चिन्हें जातिल लोपुन जगतीची
मूठभरी या यवनांनीं कां शौर्य गाजवावे
प्रभुत्व त्यांच्या शौर्याचें नच, साह्य तुझें भोंवें
हिंदुत्वास्तव प्रयत्न अमुचें सुफल कसें पावे
तुझ्यासारखे देशद्रोही जिवंत गाडावें
राजसिंह नी जसवंताचें साह्य घेइ सिंगा
चहुबाजूंनी मारा करुनि अविंध हा जिंका
मीही माझा मावळ घेउनी विजापुरीं जातो
गोवळकोंडा जिंकुनि अपुलें राज्य वाढवीतो

मेघासम मी करूनि गर्जना पाउस पाडीन
भारतीय भूमंडळ उजळिन करिन म्लेंछहीन
विजयश्रीसह आनंदें मी घेइन गांठ तुझी
सेवा करुनी कृतार्थ होइन जयसिंगा तुमची
दिल्ली पतिचें सिंहासन मग चूर्ण करूं सहज
'औरंग न वा 'जेबहि' राहिल मित्रा हें समज
अत्याचारी खडग न राही जालहि कपटाचें
रक्तजलानें पितरांचें मग तर्पण हो साचें
अंतःकरणें जुळता तुटती वज्रांचें अचल
ठिकऱ्या उडवूं सैन्याचें मग तोडुनि या जाल
सूज्ञाला ना जास्त सांगणे यांत कांहि समज
पत्रलेखनी विस्तारानें योग्य न हो समज
भेटीसाठीं येइन तुझिया मनीं नको किंतु
विश्वासाचा घात कराया मूढ न मी जंतु
पाठविला मी वाघ–नखानें अफझुल यम सदनीं
अपराध न तो होता माझा, पाप तदिय वदनीं
कपटचाशी वागणूक कपटीं यांत न तिळ दोष
सज्जन दिसतां सज्जन व्हावें, देश तसा वेष
होता नाश न जरि खानाचा पत्र धाडि कोण ?
जयसिंगा ! तूं मानुनि येई बंधु मला सान
प्रत्युत्तर तूं सूज्ञपणानें देतां भेटेन
खानाचें ही पत्र गुह्य मी तुजला दावीन
पडतीं तुज अजि दुःस्वप्नें तीं त्यांत दोष दीना
स्वातंत्र्यस्तव जगण्या मरण्या सिद्ध वीर नाना
देशा धर्मा स्मरूनी पतिता उत्तर ना देशी
माझि भवानी शिरच्छेद तव करील बघ खाशी

सूर्यास्ताच्या पूर्वी मजला कळीव तव हेत
सद्धेतू तव जरा न दिसतां नाश तुझा सत्य
स्वजन हिताची सन्मार्गाची बुद्धि देव देवो
सद्धेतूनें प्रेरित माझे पत्र पूर्ण होवो

— इत्यलम् —



## ( ३ ) दसरा

वृ. शा. वि.

आला हा दसरा कधीं न विसरा जन्मांत या वासरा
झाली दीन धरा, मनीं क्षिति धरा, मागें कधीं ना सरा
मारा मेष महीष या, न कधिही, बांधूनीया कासरा
स्वार्थत्याग करूनी रक्षण करा धेनुसवें वासरां
मारोनी गरिबांस शौर्य कधि या जन्मांत वाढेल कां ?
रक्तप्राशन जो सदैव करि, तो देवत्त्व पावेल कां ?
यासाठीं जनताभ्रमास विसरा, धाडूं नका बालकां
दुःखाच्या घनदाट कानिंनि कधीं ही प्रार्थना पालकां
जो पापी परदुःख शीतलगणीं, नीतीपथा सोडुनी
पावे देव म्हणूनी निष्ठुरपणें, तन्मस्तकीं ताडुनी
घेई प्राण यदा समग्र मिळुनी देहांत शिक्षा जनां—
जेव्हां घ्याल, तदा करील न कुणी, येईल तैसें मना,
प्रीतीनें मन पाझरेल दिनिं ज्या, ही जीवहत्या सरे

वर्षीं होईल त्या यशस्वि दसरा हें सांगतों मीं खरें.
धैर्यातें धरूनी, प्रयत्न करुनी, सत्तत्त्व हातीं धरां
वेळीं जागृत बांधवास करूनी राष्ट्रास या उद्धरा.



## (४) स्वतंत्रतेचा आनंद

अमेरिकेच्या पश्चिमभागीं वनप्रदेशांत
विळा घेउनि गुलाम चाले डाव्या हातांत
छाती उघडी केश मलिन ते मानेवरि रुळती
दावाया जणुं ऐक्य भाव रज केशातचि मिळती
क्लांत वदन तो क्लेशानें परि कार्य करी अपुलें
श्रमित होउनि तदंगातुनी घर्मबिंदु गळलें
धन्यास परि त्या कींव येइना जुंपी कामाते
कठोर हृदयीं लोक कसे हे उमजेना माते
स्वप्नीं पाही सखी मुलांसह भाग्यवशे जंव ती
मोद न मावे मनीं तयाच्या खचित खचित जगती
परस्पराते प्रेमें पाहुनी पिता, पुत्र, पत्नी
आनंदानें डोलूं लागली भक्त तसें भजनी
घोड्यावरती राव बसुनी वेगानें गेला
गांवीं अपुल्या आप्तेष्टामधिं गुंग तदा झाला
निसर्ग निर्मित निर्जिव नाना वनस्पती थोर
हर्षानें त्या बाहुनि त्याचा करिती जयजयकार
मुक्त असें हा गुलाम आतां कोण करी हेवा

असें वदुनि तो गुलाम मिळवी मुक्तीचा ठेवा
स्वतंत्रतेच्या स्वानंदानें सौख्य सदा होते
परिस पंजरी परकीयांची पीडापरि देते.



## ( ५ ) गोमातेची स्पष्टोक्ति

( चाल:-नृपममता )

तूं सुत विप्राचा असती कां विक्रय माझा करिसी
तू पुत्र हिंदु राष्ट्राचा कां विक्रय माझा करिसी
कां नीच कर्म हें करिसी कां पूर्वज नरका नेसी
आपुला धर्म कां त्यजिसी कां सुखोपभोगा मुकसी
(अंतरा) करि बा, जरा सुविचार नको अविचार
करूं तूं आतां । दे सोडुनि ही निष्ठुरता.
जरि विवेक टाकिसि सारा, तरि मातें कसला थारा
जरि इच्छिसि राष्ट्रोद्धारा, झणि घालाल मला तूं चारा
हें जरी, हृदयिं ना धरी, सत्य वैखरी, सांगत्यें तुजला
सांगत्यें तुजला ।'संबोधि न माता मजला ॥ ध्रु. ॥
तव पूर्वज कैसें होते तें विदित नसे कां तूंते
त्यांचीच कीर्ति मी गाते अनुसरसि कां न तूं त्यातें
(चाल) सुख मिळो, दुःखही टळो, पाप ते जळो
मनीषा जरिही । तरि माझी चिंता वाही. ॥ ध्रु. ॥



# ( ६ ) मेघांची कृतघ्नता

(वृत्त–दिंडी)

सहज आलों बाहेर अंगणांत
दृष्टि गेली मम नभोमंडलांत
नयनिं तेव्हां अश्रुचा पूर आला
कृत्य ऐसें करितांच मेघमाला
मेघमालेनें एक चित्त केलें
रवीवरती ते चाल करुनि गेलें
निमिषमात्रें सूर्यास चीत केलें
किरण सेवक साह्यार्थ जरी आले
प्रश्न केला सूर्यास पयोदानें
मुक्त करितिल कां विप्र पयो-दानें
शब्द आले रविमुखीं निराशेचे
विरल जगतीं राहिले विप्रसाचे
असो क्षत्रिय वा वैश्य शूद्र यांना
व्यसन समयीं सोडवा कुणी या, ना
हांक मारी साह्यार्थ अशा नाना
पाहूं आम्ही येईल दया कोणा ?
सदा पडलो उपयोगि जनांच्या मी
म्हणुनि धावुनि येतील मदिय कामी
घमेंडीनें व्यर्थशा फुगुं नकोस
जगापुढती तव विफल कंठशोष
मेघवच ते पटलें न दिनकराला
स्वयें जैसा तैसेच सकल त्याला

भासलें हें आश्चर्य नसें कांहीं
सज्जनाला दुर्गुणी दिसत नाहीं
भानुरायानें दृष्टिबद्ध केली
जनातें त्या वाटली सर्व केलि
कुणी येईना साह्य करायाला
असें पाहुनी रवि मनीं खिन्न झाला
रवे ! तुजला राखील कोण आतां
कोण आहे जगतांत तात–माता
असें म्हणुनी चिडविती मेघ त्याला
कृत्य त्यांचे पटलें न जगत्–पाला
चंद्र येउनि तोडील मेघपाशा
राम नाहीं, त्यांच्यांत सोड आशा
भिन्न नसतां जरि वंश तुझा त्याचा
तुला करितां साह्यही सत्य वाचा
तुझ्या वंशी विख्यात चंद्र आहे
राम शब्दाची जोड जया लाहे
रामचंद्राला तरी हांक मारी
अनाथांना संकटीं तोंच तारी
नाश माझा होईल ही न भीति
परी वंशाची जाय लया कीर्ति
म्हणुनी रवि तो आठवी रामचंद्र
चकोरानें वाहिला पूर्ण चंद्र
चंद्र मानव धावुनी जरि न आले
परी तुजला थांबणें प्राप्त झालें
भानुदेवें फोडिला असा टाहो
रामचंद्राला ध्यास सदा राहो

'सूर्य वंशाचें नांव लया जातें'
रामचंद्राला कसें सहन होतें
श्रवणि पडता कटु शब्द राम बोले
मेघसंघाचें आयु भरत आले
कुपित तेव्हां श्रीरामचंद्र झाला
शीघ्र त्यानें वाहिलें मारुताला
म्हणे वायो! जाऊनि पाठ फोडी
मेघसंघाची पुरी खोड मोडी
वायु वेगानें शब्द करित आला
नव्हे वारा, प्रत्यक्ष काल घाला
मेघ सैनिक हतवीर्य तदा झालें
गगन भानुस सोडोनि पळुनि गेलें
भानु देवाला पडे एक कोडे
व्यसन टाळुनि पुरविलें कुणी कोडे
रवे ! वाटे निश्चयें श्रीधराला
तुझ्यासाठीं प्रत्यक्ष देव आला



# (७) तिळ न चालतें मन्मती

कुणास धनतें मिळे अमित सौख्य भोगावया
कुणास धड तें नसे वसन देह झाकावया
धनाढ्य कुपथा वरी परि न त्या कुणी बोलती
बघूनि विपरीत हें तिळ न चालतें मन्मती
असाधु उदयाचलीं सुजन तो रसाधस्तलीं
कृतांत धवला जरा तरुण मस्तकींयाकली
परास शिरीं घेउनी स्वजन वैर आरंभिती
बघूनि विपरीत हें तिळन चालतें मन्मती
सदैव सुख सेवनीं बहुत रंगती जारिणी
सति–व्यसन–कर्दमी फसति पाप संहारिणी
खरें जरि, न वाटतें तरि पहा सतींची तती
बघुनि विपरीत हें तिळ न चालतें मन्मती
कुणी बघुनि कामिनी त्वरित मागुनी धांवती
कुणि भगिनि मानुनी तिजसि आदरे वंदिती
विरक्त म्हणुनी किती यति, तरी जगा भोंदिती
बघूनि विपरीत हें तिळ न चालतें मन्मती
स्वकीय मरतां स्वयें समुद खेळती नाचती
परांस परि तें बळें रडविण्यास आज्ञापिती
किती नरपशू असे अमित सौख्य संपादिती
बघूनि विपरीत हे तिळ न चालतें मन्मती
जरी निघत शीतसें उदक शीतला पासुनी
परी उदय पावते जलदिं उष्ण सौदामिनी
शिला द्रव न पावते, परि पहा नद्या जन्मती

बघून विपरित हें तिळ न चालतें मन्मती
निशा-समय पावतां पशु-विहंग जाती घरीं
उलूक तरी का विभो ! भ्रमण यामिनीं स्वीकरीं
नरास दिन जो गमे गमत रात्र योग्यास ती
बघुनि विपरीत हें तिळ न चालतें मन्मती
मृदुत्व कुसुमीं परी, विरह पीडितां वज्रसें
हिमांशु हिमयुक्त तो सतत ताप त्या देतसे
सुधांशु–कुसुमास त्या कवि अमूप वाखणिती
बघुनि विपरीत हें तिळ न चालतें मन्मती
जरी विमल सख्य तें परिचयें अती नासतें ?
सुतास जननी कधीं तरिच दूर कां लोटिते
अनेकविध भासतें नवल हें तया, ना मिती
बघूनि विपरीत हें तिळ न चालतें मन्मती



## (८) कवि

बनूनि नृपतिस्वयें नृपतिच्या वचा बोलतो
कृपाण करिं घेऊनी समरकर्म आरंभितो
शिरीं धरूनि सारिका समुद तो कधीं नाचतो
कवीसम जगत्रयीं बहुरुपी असे कोण तो
रमूनि अवनीवरी गगन तो कधीं स्वीकरीं
स्वमोद लहरीं करें गगन बालकांना धरी
श्रमिष्ट नरसा कधीं निबिड काननीं धांवतो
कवीसम जगत्रयीं कृति करी अशी कोण तो ?

नको संवगडी, नको रुचिर तें नको भोजन
सुवर्णमय पात्र त्या गमत मृत्तिका–भाजन
अपा त्यजुनि नित्य तो निजवधूसवे क्रीडतो
कुणी न कवि सारखी विमल भावना ठेवितो
समाज हितकारि ते कविगुरु जिथें जन्मती
स्तवूनि भजती तया सकल लोक जे सन्मती
प्रभूविण कुणी नसे कवि वरास द्याया कर
करी उभयतांस ही म्हणुनि वंदन श्रीधर



# (९) स्थित्यंतर

(टीपः–इतिहासाचीं पानें चाळल्यानंतर पूर्वीच्या स्थितींत व सद्यः–स्थितींत झालेल्या स्थित्यंतराचें चित्र डोळ्यांपुढें आलेल्या कोणत्याही सहृदय मनुष्याचें मुखांतून असेच उद्‌गार निघतील.)

(वृत्त–मदारमाला)

जेथें खलांना भरें कांपरे हो
वधायास धेनूसवें वासरां
होता जिथें थोर देशाग्रणींचा
दरारा सतींचा भला आसरा
कोठें महाराष्ट्र तो शौर्यशाली
कुठें वैभवाचा खजीना तसा
धेनु वधाचा सतींच्या छलाचा
तिथें होय बाजार देवा ! कसा ? !

देवा नको अंत पाहूस आतां
　　नसे त्राण तापास सोसावया
ना सिद्ध होती कुणीं लाविलेल्या
　　तरुला स्वहस्तेंच नाशावया
सिद्धांत ऐसा असूनी कसा तूं
　　बरें सिद्ध होसी कुकर्मास या
घालूनि आतां रमेशा ! दयाळा
　　उडी सत्वरी घालवी संशया
देशोधडी लागली बालकें ही
　　म्हणूनी करें ऊर फोडी धरा
शोकारि व्हाया तिचा नष्ट वेगें
　　कृपारूप भाला स्वहस्तीं धरा
तापत्रयांच्याहि पंका मधूनी
　　मलस्पृष्ट–धेनूस या उद्धरा
द्या एवढें द्या रमेशा ! दयाळा !
　　त्वरें हीच भिक्षा नत श्रीधरा.



## ( १० ) – स्वर्ग

**मुलगा** :– (टीप Heaven या कवितेच्या आधारें )

ज्याचें गीत सदैव गात बसतां आनंद होतो तुला
अंकीं घेउनिया मला वदसि तूं ‘नाहीं तयाला तुला’
सौख्याचा रस बालसंघ अवघा मोदें जिथें सेवितो
माते ! सांग मला प्रसन्न हृदयें, कोठे वसे स्वर्ग तो ?
जेथें दे रमणीयता तरुलता पुष्पें फळें लादुनी
वाहे मंद मरंद वायुलहरीं जेथें प्रदेशांतुनी
जेथें मोर विचित्र रंग धरुनी मेघागमें नाचतो
माते ! सांग मला चमत्कृतिजका तेथें वसे स्वर्ग तो
जेथें निर्मल वाहती सुतटिनी, ज्यातें न कोठे सरी
स्पर्धा माणिक तुल्यरत्नहि जिथें, सूर्य प्रभेशी करी
लोकां दुर्मिळ तें सुमौक्तिक जिथें हंस स्वये सेवितो
माते ! सांग मला चमत्कृतिज कां तेथे वसे स्वर्ग तो

**आई** :–पुण्यात्मे जन जे तयाविण कुणी जेथे न केव्हां दिसे
बोले ईश जयास सौख्यद सदां ते धाम माझे असे
दृष्टिक्षेप मदांध नीच कपटी, यांचा न होतो जिथें
पावित्र्याविण वस्तुना मुळि मिळे तो स्वर्ग आहे तिथें



## ( ११ ) लतिकावियोग

( प्रसंग :–आपल्या हातांनीं लाविलेल्या वेलीचा नाश झालेला पाहून निघालेले एका स्त्रीचे उद्‌गार )

(वृत्त–शा. वि. )

पाणी सिंचुनि मी तुलाच लतिके ! संगोपिलें प्रीतीनें
केला मंडप; काक दृष्टि कुणिहि टाकील, या भीतिनें
सोडोनी लतिके ! महत्तम अशा कामास एकीकडे
कांठी घेऊनि ना तुझ्याच करितां मी हाणिलीं लाकडें
अंगीं शक्ति मला जरीहि नव्हती पाऊल टाकावया
आणाया चुकल्यें मुळीं न कधिही पाणी तुला प्यावया
निंदाव्यंजक लोक शब्द वदले, पर्वा न केली परी
लोकांचें मुख हें मुळीं न धरवें हें जाणलें अंतरीं
केलें आर्जव मी बहुपरि तुझ्यासाठींच गे लाडकें !
लोकांच्या घरिं याचिली किति तुझ्या छायार्थ मी काटकें
आनंदें तव झोंक रांगत कधीं जाईल कोणीकडे
भीतीनें चहुंबाजुंनी म्हणुनिया मी लाविलीं लाकडें
माझीं दोन मुलें मला त्यजुनिया स्वर्गास गेलीं यदा
झालें दुःख तदा असह्य तुज ती ना वर्णवे आपदा
होता जन्म तुझा, मला विसर तो होतो न कोठें जरा
दुर्दैवें लतिके ! वियोग तव हा फोडी मदीयांतरा
शेजारीण म्हणे विनम्र मजला ' येऊनि जा एकदां '
मित्रांचीं वचनें परस्पर मुळी मोडूं नये हो कदा
सोडोनि लतिकेस मी म्हणुनिया शेजारिं गेलें यदा

मत्कर्णीं करुणार्त हांक पडली, धांवूनि आल्ये तदां
पाहें तों लतिकेस केशि धरलें एका वृषानें मदें
ओढोनी तिजला तदा फरफरा, मेला तिला तापदे
दुष्टानें मम लाडकीस अदयें पायातळीं घातले
हांहां मी म्हणतां पळांत अवघ्या त्यानें तिला नाशिले

  

गेली वेल परी तसेच मम हे बाहू कसे राहिले
डोळे हे सुजले परी न मिटले, आश्चर्य वाटे भले
माझ्या दैवि जरी अशाच लिहल्या या तापदा आपदा
देवा ! नेई मला तरी झडकरी ही प्रार्थना त्वप्तदा

## (१२) कलंकित चंद्रास

(वृत्त– शा. वि. )

काव्यात्मा म्हणुनी कितीक जन हे नादीं तुझ्या लागती
सारी रात्र तुझ्या मुखांतिल सुधापानार्थ हे जागती
येतांना दिसतांच तूं नभि तुला उच्चासनीं स्थापिती
विद्या काव्य कला गुणी कुशल हा ऐसे किती बोलती
विश्वध्वांत समूळ नेतिल लया ऐशा तुझ्या या कला
किर्तीचा ध्वज रोवितील जगिं त्या निःशंक वाटे मला
दैवे रुपवती तशांतुनि मिळे जोत्स्ना वधू ही तुला
ऐसें भाग्य असूनि डाग तनुला कां हा असा निर्मिला
शोभे जेंवि न वस्त्र भूषण युता सौभाग्यहीनांगना
विद्वन्मान्य तसा कितीही असला शोभे न शीलाविना

आहे शुद्ध जसा वरुनि तसला होसी जरी अंतरीं
नाहीं मोल गुणा तुझ्या मग मुळीं हे जाण चंद्रा वरी



## (१३) गुलाबास

(वृ. दिंडी)

कष्ट करुनी दिनभरी शीण आला
म्हणुनि पडलो बाहेर फिरायाला
फिरत आलों रम्यशा उपवनीं मी
जिथें दिसल्या तरुलता विविध नामी
उष्णमासाच्या परि प्रखर तापें
शुष्क झालीं होतींच सकल रोपें
फिरत बागेच्या मध्यभागिं आलो
नवल तेथील पाहूनि चकित झालो
गुलाबाच्या पाकळ्या गळालेल्या
भूमिभागीं पाहिल्या विखुरलेल्या
कुसुम–वृक्षीं परि एक गुलाबाचें
करित होतें सानंद नृत्य साचें
मित्र नव्हते कोणीहि तिथें त्याचे
फूल नव्हते अन्यही गुलाबाचें
विपत्कालीं द्यावया ध्यैर्य त्यासी
कुणिहि कलिका दिसली न त्याजपाशी
फुला ! तांडव तव मज न गोड वाटे

बघुनि तुजला एकटे हृदय फाटे
जिथें गेलें तव मित्र तिथें जाई
झोंप तेथें जाऊनि सुखे घेई
शब्दवदुनी यापरी गुलाबातें
झणीं खुडिलें मीं तेच कुसुम हातें
वेगळाल्या पाकळ्या करुनि त्यांच्या
भूमिभागीं सांडिल्या पादपाच्या

  

फूल खुडिलें म्हणुनीच लोक मातें
निर्दयीं हा वदतील या वचाते
परि न त्याची वाटेल मला खंती
पाप तिळही लागेल ही न भीति
मित्र माझे जव मला टाकितील
झरे प्रेमाचें यदा आटतील
क्षणी माझे जावोत तदा प्राण
विभो ! विनती तव पदी हीच जाण
विपदि माता टाकील बालकाते
आप्त सारे त्यजितील पूर्व नाते
अन्य हृदयें होतील जरी पापी
मित्र सोडी घडणें न हें कदापि

  

अशा मित्रांचा लाभ नसे जेथें
मोद कैसा वाटेल मना तेथें
शून्य ऐशा जगतांत कोण राही
मीच आतां पाहतो सर्व कांहीं

The last of Rose Cummers चें रूपांतर

## ( १४ ) गरीब गुराखी

(पद–चाल–लावणी)

शिव्या नका मज देऊं मालक, मी नच अपराधी
दुखविले मी नच कोणा कधीं
नका मारु मज वृथा दयाळा ! देउनि दोष मला
ठेवणें योग्य न संशय मला
आजवरी मी बहुत राखिलीं गुरेंहि लोकांचीं
ठेवुनि सदा निगा त्यांची
शपथ घेउनि देवाची मी, तुम्हास हे कथितो
मारिला बैल न मुळि तो
नुकसानीचें मोल मागतां देऊं काय तरी ?
खावया मज न पुरी भाकरी
घ्यावे कांही कष्ट करुनी, माझ्यापासुन तुम्ही
सालभर ठेवुन तुमच्या घरीं
कांहीं करावे या देहाचें, देह तुम्हां विकला
नका परि दोष देउ मजला
जन्म घेइ जो मृत्युलोकिं त्या, मृत्यु न कधिं टळला
तत्त्व हे ठाऊक सकलाला
वैद्य आणुनि औषध देती, उपाय बहु करिती
परि ते सर्व वृथा जाती
ज्याची भरली घडी तयाची, दया न ये काळा
तत्त्व हे ठाऊक सकलाला
कळतें परी हें वळतें मुळि नां दोष दुजा देती
ठेवुनी निमित्त त्यावरती

**तारी** ज्यासी देव तयासी, कोण जगीं मारी
कितिही प्रहार केलें तरी
**प्र**ल्हादासी गजपदिं बांधुनि यथेच्छ तुडवीले
सांगा काय तया झाले
**चंद्रहास्य** वध करावयाते, दुष्ट बुद्धि झटला
मिळाले उलटचि फळ त्याला
**सांगु** कशाला, फार तुम्हाला, सूज्ञ तुम्हा कळते
गुराखी काय मला येते
**दोन** शब्द हें अखेरचे परि भीतभीत सांगे
मालक येउ नका रागे
**देवा** जयासी मारी त्यासी तारी कोण जगीं
दुजाला दोष लावणें उगी



## ( १५ ) संक्रांत

(चाल-एकांत वास दे)

तिळगूळ
नाम हे बाळ !
कुणी तुज दिधलें
वाटतें मला तें नाम देऊनी फसले
विसरशी
स्वरुप—जातिशी
गुळा ठकवीसी
अस्तित्त्व तयाचें पूर्ण लयातें नेसी

ना तीळ
तसा तो गूळ
कुठेंहि दिसतो
जो स्वत्त्व सोडि त्या मान कुठें कां मिळतो

जगमहा
कपट–मय पहा
पुरवि तव कोड
"तिळगूळ घेउनि" म्हणती बोला गोड

कां तुला
कपट हें तिळा
कळेना अजुनी
हे कपटी जग तुज फसविल गोंजारुनी

जोंवरी
कार्य तोंवरी
दाविती लोभ
संपता कार्य तों कायम त्यांचा क्षोभ

शुद्धता
तशिच सत्यता
मुळि न ज्या ठावें
त्यांनींच कसें बा सरळ बोल बोलावे

शुद्धता
तशी सरलता
जयाच्या अंतीं
ते सरळ बोलति मुळि न कुणाला भीती

खल किती
मधुर बोलती
नित्य लोकांस
परि हृदयीं तयाच्या हलाहलाचा वास
सांगुनि
म्हणुनि कां कुणी
बोलतो गोड
शुद्धता मनाची नेइल विलया तेढ
तिळगूळ देतिही
सकल
परि न मज झाला
उलगडा " रूढि वा शास्त्र " असे हा मजला
परि मला
अज्ञ बुद्धिला
वाटते जे कां ?
सांगतो तुला ते नेइल विलया शंका
सजविती
कुटिल लोक ते
कुटिलता कांटें
कांटे न तिळाचे सत्य मला हे वाटे
विविधतां
रंगि देखतां
समज हा होतो
आचार विविधता दोष जन देतो
निर्दोष
तरी तुज दोष

खचित जन देती
आश्चर्य हेंच कीं, मुळीं तुला ना खंती
मनिं असे
परि न जनिं दिसें
सामयता कधिही
होणार कार्य ना त्यांच्या हातें तिळ ही
संक्रमण
भीति आक्रमण
करीं तू वेगें
येउं दे खरोखर शौर्य धैर्य तें अंगीं
करुनिया
मनाची स्थालि
शुद्ध जें त्याची
द्या आंच तिला कठिण कठिण हृदयाची
सुविचार
तीळ तिजवर
सुखानें ठवा
त्यावरी कृतीचा पाक लगबगे चढवा
विजय हा
त्यावरी पहा
खरोखर कांटा
तिळगूळ घेउनि हाच जनाते वाटां
संक्रांत
हीच विख्यात
होय हो जगतां
'तिळगूळ' सार्थ हे श्रीधर बोले आतां

संक्रांत
तीच भारतां
सत्य संक्रात
होईल जेधवा सागरापार संक्रांत



## ( १६ ) मत्सर

(चाल-दिंडी)

चंदनाचा चहुंकडे घमघमाट
जिथें तेथें त्याचाच थाटमाट
मत्सरानें पाहून बेत केला
चंदनाचा पाहिजे नाश झाला
चंदनाचें घेऊनि खोड हातीं
घासुनी तें बनविले सान अंती
झिजत जों जों तों तोच वास त्याचा
वास घेई हृदयांत सज्जनांच्या
नाद तेव्हां सोडुनि चंदनाचा
त्याग केला मत्सरें तत्गृहाचा
इक्षुदंडाच्या गृहीं स्वारि आली
घोर ऐशी त्यावरी करणि केली
सुरा हातीं घेऊनि घाव घाली
इंक्षुदंडाऽवयवे गलित केली
छिन्न जों जों एकेक अंग होत

स्वादुरस तत् सज्जना मोद देत
मत्सरानें पाहुनि हा प्रकार
पळुनि गेला सोडुनि इक्षुदार
पुढें शिरला तो भव्यशा गृहांत
सुवर्णाचा पाहिला लखलखाट
कांति त्याची पाहुनि दिपुनि गेलें
मत्सराचें तइ नेत्र लाल झाले
म्हणे " याचा होईल नाश जेव्हां
पोटभर मी खाईन अन्न तेव्हां
करिन याते जरि दग्ध अग्निपूर्ण
नाश त्याचा होईल तदा तूर्ण
सुवर्णाचें राही, न नांव लोकीं
कृत्य ऐसे करितोंच हें विलोकीं
मृत्तिकेचें करुनिया थोर कुंड
त्यांत अग्नी टाकूनि, उठे गुंड
सुवर्णाचें धरुनिया हातपाय
अग्निकुंडी टाकिला तदिय काय
मत्सरातें वाटलें " दग्ध झाला "
सुवर्णाचा मी नायनाट केला
परीं घडलें तें बहुत नवल जें कां
चित्त देउनि विबंधुहो तुम्हीं ऐका
अग्निकुंडी टाकितां सुवर्णातें
नवल हे कीं पावले सुवर्णाते
अधिक त्याचें जाहलें यदा तेज
मत्सराते वाटली मनीं लाज
क्षणिक असते परि लाज दुर्जनांची

तशी झाली स्थिति तदा मत्सराची
सोडुनीया मग नाद सुवर्णाचा
पुढे शिरला तो गृहीं सज्जनाच्या
कपट ज्याते स्वप्निही मुळि न ठावे
त्रास कोणा देणें न जया भावे
लुब्ध जनता ज्याचिया सुस्वभावें
खचित सज्जन हें नांव तया द्यावें
मनी जें कां बाहेर तेंच दावी
बोल जैसें तैसीच कृती ठेवी
स्तुती–निंदा पाहि जो एकभावे
खचित सज्जन हें नांव तया द्यावें
प्राण जावो, परि सत्य कधि न सोडी
पाप मुळिना, सर्वदा पुण्य जोडी
पाय हे मीं वा होमकुंडि न्यावें
खचित सज्जन हें नांव तया द्यावें
ऋद्धिसिद्धि जोडिती जया हात
इंदिरेचाहि वास ज्या गृहांत
त्याग करुनि देशार्थ, बंदीं जावें
खचित सज्जन हें नांव तया द्यावें

  

अशा एका सज्जनगृहीं आला
दुष्ट मत्सर साधूनि संधि वेळा
द्वारिं त्याच्या बैसून अहोरात्र
आल्यागेल्यासी वृत्त हे कथीत
कांहो ! कोठें चालला तुम्ही सभ्य ?

आंत जाउनि होईल काय लाभ
साधु–नादीं लागतां तुम्ही काय ?
देव याते मानितां तुम्ही काय!
आव आणि हा साधु सज्जनांचा
गंध मुळि ना यासही तत्गुणांचा
मूर्ख म्हणुनी लागतां तुम्ही नादी
घरीं जावें; हा सौख्य तुम्हां ने, दी
बोलण्याचा कधीं कधीं योग येतो
श्रवण करुनी श्रोताहि त्रस्त होतो
जमत नाही कुणि लोक भाषणास !
असें असतां कां व्यर्थ तुम्हां आंस ?
ऐकण्याची जरि हौस तुम्हां फार
मदिय वडिलांचे बोल मजेदार
निमंत्रित येतील नवल काय ?
अनाहूतहि लोटेल समूदाय
बोल ऐसे अनमोल बोलला तो
फोल परि ते जाहले; लाजला तो
मत्सरातें पाडूनि तदा खाली
साधुभेटिस्तव मंडळी निघाली
मत्सरानें जरि यत्न बहू केला
सज्जनांचें गुण सकल झांकण्याला
परी त्याचा जाहला उलट नाश
सज्जनांचा उत्कर्ष होय खास
तेज रविचें झाकेल करतलानें
गुण न साधूंचें तेंवि मत्सरानें

उलुक येवो बाहेर वा, न, येवो
सूर्य उदया पावेल; कांहि होवो
इक्षुदंडाचें, तसे, चंदनाचें
सुवर्णाचें तैसेंच सज्जनांचे
गुणहि लोपावे म्हणुनि यत्न केले
. मत्सरानें; परि सर्व फोल झालें.
दूर ठेवा म्हणुनिया मत्सरास
उगिच देतो हो फार जना त्रास
'श्रीधरा ! ' या लागो न मुळीं वारा
प्रार्थना ही धावूनि दीन तारा
गृहीं होतां शिरकाव मत्सराचा
मुलें बाळें—नासती सत्यवाचा
देश—गुरुचा जे द्वेष करिति त्यांच्या
भाग्यरविचा तत् उदय होय कैचा
गुरुद्वेषहि करितांच राक्षसानें
नाश झाला त्याचाच निजकृतीनें
कचे संपादुनि लोभ तैं गुरूंचा
दिव्य संजीवनि लाभ घे सदाचा
हिंद देशा लागली कीड तीहि
कितिक वर्षें भरुनिही येत नाहीं
सौख्य बंधूचे पाहवे न डोळां
मत्सरानें ग्रासिले भारताला
दूर ठेवा म्हणुनिया मत्सरास
उगिच देतो हा फार जना त्रास

श्रीधरा ! या लागो न मुळीं वारा
प्रार्थना ही धावूनि दीन तारा



## (१७)–एकांत--

आहे चंचल ही किती तरि पहा दृष्टी मनाची बरें
वेगाशीं तुलना तदीय करितां, तो वेग मागे सरे
वारा चंचल तो परीहि पडतो मागेमनाच्या किती
सूर्याची किरणें सवेग परिना त्यांच्या पुढें धांवती
माते या प्रियभूमिचें स्मरणही होता क्षणीं वाटतें
कीं मी या विजनीं मुळीच नसुनी आहे गृही सत्य तें
पाहे मी फिरूनी सभोंवर यदा माझ्या स्थितीच्याकडे
आशा भंगचि हो क्षणांत म्हणुनी हें आवरेना रडे
गेले येथिल हे विहंग सगळे विश्रांति ही घ्यावया
तैसे सर्व पशू विराम करिती स्वस्थानि जाउनिया
ऐशा निर्जनि ही घडे क्षणभरी विश्रांतिचा लाभ तो
मीहि पर्णकुटी करूनि गमना निद्रासुखें चाखितो
सर्वत्रस्थलिही पुरुनि उरली ही ईश्वराची दया
घाली माळ सदा निराश हृदयीं सौख्यांसही द्यावया
जे जे पीडित त्या जनास अवघ्या माया सदा लाविते
जें दैवे दिधलें तयांत मनुजा संतुष्ट ही ठेवते
( टीप–Solutude या कवितेंच्या आधारें )

## (१८) सांवर ही माउली

सांवर ही माउली–भारता–धृ.
सौख्य मदिय तें विलया गेलें
परि न खंति ही मुळीं
निशिदिनिं माझा जीव तळमळे
पाण्याविण मासळी
विटंबना ही किति तरि साहूं !
शतकें ही लोटली
छाती नव्हती जिथे कुणाची
स्पर्शाया सावली
तेंच अतां हें नशीब फुटतां
स्पर्शे काकावली
लाल पोटचें कितीक पडले
अन्यायाला बळी
भगवा झेंडा जयें रोविला
सुखविलि ही माउली
वीर शिवाजी तोही गेला
राहूं कशि या स्थलीं ?
बाल तिलक तो श्रेष्ठचि माझा
येईल कां भूतली ?
जितेंद्र तोही सोडुनि गेला
ऐशा संकट–गळीं
हरिणी जैसी पाडस विहिना
तैसी गत जाहली

विसरलास कां शौर्य आपुलें
झालासी निर्बळी
स्मरण जरासें परकी याना
नानांचें दे तरी
ऊठ भारता ! डोळे उघडी
जळते दुःखानलीं
जीव मुठींतचि धरुनि राहिले
आजवरी भूतलीं
सोड षंढता पुरें जाहली
माय तुझी गांजली
न्याय खलांनीं वेशि टांगिला
पुत्र घेउनि बळी
उपकाराची अपकारानें
फेड कशी जाहली !
प्राण दान तें दिधले ज्यांनीं
फांस तयांच्या गळीं !
सर्पाते जरि दुग्ध पाजिले
उलटे अंगावरीं
युद्धीं केलें साह्य तुम्हीं जें
उपकृति 'दिधले बळी'
व्यर्थ घेतलें बळीच यांनीं
खूण न ही चांगली
विनाश कालीं फिरते बुद्धि
हीच गती या स्थलीं
रावण सत्ता विलया गेली

क्षण न लागला मुळीं
कौरव–कुलही धुळीं मिळालें
नीति टांगिता सुळीं
नारायण तो बळी घेतला
आनंदानें परी
काय जाहली तिची परी ती
तृष्णा कां हो पुरी ?
सत्तेचा हा प्रभाव सगळा
धुंदमती जाहली
कालचक्र हें सदैव फिरतें
सत्य असे हें तरी
उगीच बसुनी षंढासम बा !
आणि न व्यसनावली
कसें घेतलें क्रूरपणानें
माझें सुत हे बळी
त्राण न मजला दृश्य पहाया
सांवर ही माउली
भाग्य–रवी तव उदया येईल
यांत न शंका मुळी
अधिष्ठान परि भगवंताचें
ठेवुनि कर्मे करी

O O O



## ( १९ )–उडणाऱ्या काकांस–

काका ! कां तूं आकाशाचा । आश्रय बा केला
 सोडुनि जग हें सुरम्य असलें उडोनि कां गेला
पुण्यभूमिही श्रीरामाची तशीच कृष्णाची
 युधिष्ठिराची नलराजाची तशी समर्थाची
विटाळली ही नीच करें कां राग म्हणुनि आला ?
 सांग सांग या उड्डाणाचा हेतु न मज कळला
नास्तिक जनता बनली जारी पिंड न तुज देती
 काय करावे राहुनि येथें उरलि न धर्म–रती
असें वाटलें तुजला म्हणुनि विषण्ण हृदयानें
 मारलीस कां उंच भरारी, अतीव वेगानें
प्रजा दक्षता न्याय नीतिचा गंध न मुळि उरला
 रागावुनि कां नृपती वरती उडोनिया गेला
किंवा कपटीं जग हें सारें फसविल तुज म्हणुनी
 नको नको हे इथें राहणें, गमले काय मनीं
दृष्टि आणिक रंग तुझा तो जगतानें हरिला
 मानखंडणा झाली म्हणुनी विषण्ण कां झाला ?
हिंदपुत्र हें अन्यायाला बळी किती पडले
 दृश्य तुला ना पाहवलें हें म्हणुनि गमन केले
विटंबना ही हिंदु–भूमिची तिच्या सुपुत्रांना
 सांगाया का तशीच जाशी; स्वर्गीं देवांना
काल सर्प हे भूमिवरचें करिती फूत्कार
 पाचारण कां करिसी गरुडा; करुनि सत्कार
दयामृताच्या मेघा किंवा जासी भेटाया

" दयामृताचें दोन थेंब तरी टाका " सांगाया
जाऊ नको तूं सोडूनि जग हें कंटाळुनि याते
ये ! ये ! देऊं सर्वें श्रीधरा तोंड संकटातें

## ( २० )—जन्मांध—

प्रिय मित्रांनों ! सांगा सांगा मजला
म्हणतां प्रकाश काशाला ?
मी उच्च अशा येऊनि नर जन्माला
सर्वस्वी मुकलों ज्याला
सुख नजरेचें काय असें डोळ्याला
विनवी ऽ ऽ सांगा अंधाला
शिवरायाच्या स्वातंत्र्याचा गड हा
मित्र हो ! नयनांनीं पहा
किति सुंदरसा अग्र्याचा हा ताज
जणुं हा सृष्टिचा साज
हा किल्ला देवगिरीचा
हा वाडा थोर पुण्याचा
हा प्रांत महाराष्ट्राचा
हे देखावे पाहुनि हर्षित झाला
वंगळलें कसे अंधाला
नित वदतां हें रविप्रकाशें तेजें
मजला हे परिना उमजें
तो उष्ण असे स्पर्श कळते मजला

करिकसा दिवस रात्रीला
परि माझे मी दिवस रात्र बनवीतो
खेळतो यदा वा निजतो
मी नेहमींचा असाच जागायाचा
मजसि न बाध रात्रीचा
आंधळा मजसि हो बघुनि
गाळितां अश्रुंका नयनीं
दु:खानें विव्हळ बनुनीं
परि धैर्यानें सोसिन मी दु:खाते
कल्पना जयाचि न माते
कधि दु:खाचें सौख्यपायसीं लवण
कालवा कधींही लकन
मी अंध असे दु:ख न याचें मजला
परि टोचें शल्य मनाला
जरि शक्य असे काढा ओढुनि तेच
होईल मोद मज साच
तो किल्ला देवगिरीचा
तो वाडा थोर पुण्याचा
तो प्रांत महाराष्ट्राचा
तें वैभव ही मायभूमिचें मजला
पाहु द्या मदिय नयनाला
मम माय जरी कुरुप कितिही असली
पाहुं द्या नयनिंही तसली
जरि परक्याची सुंदर माता कितिही
तिकडें का बालक जाई

दाखवा मला ती आई
नवमास उदरीं जी वाही
मटमटा मुके जी घेई
त्या मातेचें वैभव बघुद्या थोर
अंधत्व करा हें दूर

  

हे अंधाचे बोल ऐकुनी मित्र
स्वस्थहो ज्यापरी चित्र
तुजअंधपणा देवें दिधला छान
उपकार तयाचें मान
हें कपटाचें अधम कृत्य जगताचें
दृष्टिला तुझ्यानच जाचें
परनारीचा दृष्टिक्षेप न बाधे
सहजेंच पुण्य हें लाधे
ही माय तुझी वैभव शिखरीं होती
आजही दुःखानें रडती
किति नीच तिची विटंबना बहु करिती
आम्हांस परी ना खंती
हे डोळस आम्ही पुत्र
पाहतो उघडुनि नेत्र
भू मातेचें हे चित्र
परि लाज न हो तिळ वाटे आम्हाला
कशाला दृष्टि डोळयांला

★ 卐 卐

मी अंध परी घालविन अंधत्त्वाला
देताच ताप आशीला
जे अंधकुणी दिसतील मदाने राजे
डोळस त्या बनवित तेजें
मग वदे कोण मज अंध
दृष्टिचा मुळींना गंध
मी करीन त्यासी अंध
परि सुखविन ही माता निस्त्राण
जोवरी कुडीतच प्राण
(टीप:- The Blind Boy च्या आधारें)

  

## (२१)-"फूलचि पडले गळून"-

**प्रसंग**:-( अगदीं तरुण मुलगा एकाएकीं मृत्युमुखीं **पडल्यावर मातेच्या मुखां**तून हेच उद्गार बाहेर पडतील.)

फूलचि पडले गळून – अवचित
प्रभात काळीं खुललें डुललें
वेलीवर हें बसून
वायूनें ज्या झोके दिधले
गाणें प्रेमळ म्हणून
दरवळला लव सुवास कोठें
जासी तोंच निघून

दिवस किती तरि होते तुजला
जगण्याचें हें अजून
भ्रमर निराशे परतुन जातिल
गुंजारव ही करून
भगिनी कलिका येइल आतां
खाऊं हातीं धरून
सुखवावें हें जग थोडेसें,
जावें मग येथून
हेतु तुझा हा जन्माचा कां ?
यइन मजसी कळून
तुझी योग्यता सुंदरताही
यावी जगतां कळून
निसर्ग तुज कां ? आणी येथें
तत्त्व मनीं हे धरून
लावुनि चटका जगास थोडा
जाती मग हे निघून
तेज आपुलें जगास दावुनी
जाती स्वर्गीं मरून
तारे दाविती प्रकाश थोडा
जाती मग लोपून
अर्थ जोवरी जगून भूवरी
जावें तोच मरून
ज्ञानेश्वर हे स्वर्गीं गेले
ज्ञानेश्वरी ही लिहून
बाळ गोखले किती वयाचें

गेले जेव्हां निघून
दिव्य नाटकें बालें ज्याची
गडकरि गेला त्यजून
किती दाखलें देऊं तुम्हांला ?
जीवची गेला थकून
' अर्थ जोवरी जगून भूवरि
जावें तोच मरून '
तत्त्व असें हे कळलें मजला
प्रकार सारा बघून



## ( २२ )–मुक्त–सिंह–

(चाल–चंद्रकांत)

वार्ता कळली जिकडे तिकडे " मुक्त सिंह केला "
श्वानांनीं जो फसवुनि पूर्वी पंजरि बसवीला
सिंह मुक्त हा केला कैसा ? संशय मनि आला
श्वानांनो ! तत् निवृत्त्यर्थ करि प्रश्न मालिकेला
अशांतता कां विलया गेली भारत भू पृष्ठीं ?
केली म्हणुनी सिंहावरती दयामृता वृष्टी ! ! !
बद्ध सिंह तो केला परिही शांतता न झाली
कंटाळुनि कां आज तयाची मुक्तताच केली ?
सिंहावरती भुंकुनि आम्ही तुटोनिया पडलों
खिळी न परी तिळ तया वाटली बघुनि हें थकलों

असें वाटलें मनीं म्हणुनि कां मुक्त तया केलें
 सांगा सांगा काय असे तरि गूढ न मज कळले
एक सिंह तो धरितां आम्ही असंख्यही जमले
 धरा धरा हो आम्हांला ही समोदवच वदले
ठेवावें हें कोठें आतां जागा तिळ नुरली
 असें वाटलें काय म्हणुनी बुद्धि हीच सुचली
'मृगेंद्र धरिला' घाबरुनि हे जातिल मृग सारे
 मृग परितेही मृगेंद्र बनले उलटे हे वारे
जीव घेतलें अन्यायानें क्षुब्ध मनें झालीं
 धडकी भरली हृदयीं म्हणुनी मुक्तताच केली
जिकडे तिकडे सिंह हिंडती किति रानोमाळी
 नको नको हा सिंह ठेवणें वेळ कठिण आली
सिंहाच्या या शांतपणाची धडकी हृदिं भरली
 अशांत होता आयुष्याची तुमच्या घटि भरली
सिंहगर्जना झालि न अजुनी सोडुनि जा रान
 राहुनि येथें करा जिवाचें नच तुमच्या रान
लांगुल चालन, तसे भुंकणें, खेळ पुरे आतां
 घरसोडीचा प्रकार तुमचा, फसवी ना चित्ता
यथेच्छ केली मर्कट-चेष्टा, सुप्त सिंह होता
 जागा झाला श्वानांनो! तो कृष्ण करा आतां

## (२३ )–पश्चात्ताप–

जन्मापासुनि ना दिलें सुख कुणा, ना कांहि संपादिलें
नाहीं स्वार्थ परार्थहि मिळविला, कोणा ना संतोषिलें
विद्या–काव्य–कला अपूर्ण शिकलो; ना मान कोठें मिळे
ऐसे जीवित कां दिलें मजसि हे देवा मुळीं ना कळे
नाहीं आर्जव शक्तिही दिलि मला, जेणें वळे दुर्जन
नाहीं पक्वपणा मतीस म्हणुनी; साधे न सत्–मज्जन
येतें सर्व मला अपूर्व परितें, सारे गमे सज्जना
"होतो मत् अपमान सज्जनगणीं" ही योग्य संभावना
जन्मा येउनि मी खरें शिणविली माता मदीया वृथा
देवा आळविलें मुळीं न कधिही ; ना ऐकिल्या सत्कथा
काया–वाङ्मघुरें मुळीं उपकृती केली न कोणावरी
ऐसें व्यर्थ जिणें धरुनि जगलो प्रेतापरी भूवरी
देई जन्म मला असा कुसुमसा, जो इच्छिती सज्जन
'देवाच्या शिरि कीं बसेन अथवा जाई वनी वाळुन'
जन्मा येउनिया पदोपदिं जरि हो मान्यता खंडन
यापेक्षां मरणें वरें; परि नको हें काकसें जीवन



## ( २४ )–इभ्रतीसाठीं–

खटाटोपी कशासाठीं? मुळीं त्या इभ्रतीसाठीं ध्रृ.–
रणीं पडती वीर तूटुनी, अरीच्या समुहामाजीं
कशासाठीं मला सांगा? मुळीं त्या इभ्रतीसाठीं– १
धर्म–पत्नी दुर्दशा ती, पांडवांनीं साहिली
कशासाठीं मला सांगा, मुळीं त्या इभ्रतीसाठीं– २
डोंम सदनीं नीच कर्म हरिश्चंद्र स्वीकरी
कशासाठीं मला सांसा, मुळीं त्या इभ्रतीसाठीं– ३
पुत्र पत्नी त्याग करुनी, राज्य तेही त्यागिलें
कशासाठीं मला सांगा, मुळीं त्या इभ्रतीसाठीं– ४
आत्मजाचें मांस हस्तें मुसल धरुनी कांडिले
कशासाठीं मला सांगा, मुळीं त्या इभ्रतीसाठी– ५
मनोरा तो अशोकाचा, दिल्लिपतिचा ताज किंवा
कशासाठीं मला सांगा, मुळीं त्या इभ्रतीसाठीं– ६
वीरपत्नी क्षत्रियांच्या अग्निकुंडी प्राण देती
खटाटोपी कशासाठीं ? मुळीं त्या इभ्रतीसाठीं– ७
सिंहगडी तो वीर पडला, भूषवीली मायभूमी
खटाटोपी कशासाठी ? मुळीं त्या इभ्रतीसाठीं– ८
आर्य जननी मुक्त व्हाया, कष्टवीती देह जे कां
खटाटोपी कशासाठीं, मुळीं त्या इभ्रतीसाठीं– ९
नीचकर्मं द्रव्य वेश्या चोरही जारही मिळवी
धनाची पाड ना मुळिही–जगावे इभ्रतीसाठीं– १०
मान देती चोर वेश्या जार यांना का कुणीं ?
मान देती थोर सारे, जगी या इभ्रतीसाठीं– ११

कशाला दाखले देऊं, शीण आला पूर्ण आतां
जगावें, मरावें, जगति—केवला इभ्रतीसाठीं— १२
काकसम जे इच्छिती कीं, जीवनाते इच्छु दे
मजसि नलगे हीन असलें—जगूं दे इभ्रतीसाठीं— १३
प्राण जावो; कांहि होवो, डाग लागो तिळ न तनुला
हीच इच्छा श्रीधराची कशाला ? इभ्रतीसाठीं— १४
"इभ्रतीचा नाश होतो" अक्षरें हीं ऐकण्या—
पूर्वीं देव प्राण जावो, मुळीं त्या इभ्रतीसाठीं— १५
ईश चरणी प्रार्थना ही करुनी कार्या लागतो
देव होवो साह्य आतां; मुळीं त्या इभ्रतीसाठी— १६



# ( २५ )—शक्य ना, तें टाळणें—

भोग देवा ! दैवि लिहले शक्य ना ते टाळणें
राजसदनीं सारथ्याचें काम करणें कां नलें
डोम सदनीं पाणि कांहो ! हरिश्चंद्रें वाहणें —१
थोर जे कां शौर्य ज्याचें गाजलें कीं भूवरी
विक्रमे कां तेलियाच्या संगती हो राबणें— २
देव म्हणुनि लोक सारे वंदिती ज्या संतत
त्याच देवें दास्य करूनी असुर सदनीं राबणें —३
पूज्य जी कां सकल लोका माय सीता बहुपरी
काय रामे त्याच सतिला काननासी धाडणें |— ४

भुजगसे यत् भुजग होते, शत्रू बघतां कांपती
बल्लवाची नीच कर्में करुनि कांहीं राहणें —५
दास्य म्हणजे काय ? जीनें स्वप्नीही ना ठाऊक
मायभूनें त्याच कांहीं दास्यि दिन हें कंठणें— ६
काय आहे कळत नाहीं, मात्र इतुकें हे कळें—
भोग देवा ! दैवि लिहलें ! शक्य ना तें टाळणें ७



## ( २६ )–विविध चित्रें–

सुटी मिळतां कोणास बहु दिसाची
हौस वाटे मग सहज प्रवासाची
फिरत मुंबापुरी मित्र सर्व आलों
राणि बागा पाहुनी दंग झालो
गुलाबांची तशि कुठें चंपकाची
रातराणीची कुठें मोगऱ्याची
विविध पुष्पें विकसतां सुटे गंध
भ्रमर सारे बिलगले बनुनि अंध
फुलें सारी संतस्त तयें केली
गंध सारा शोषून करित केली
दुजें नव्हते कर्तव्य तया ठावें
मात्र पुष्पीं रममाण सदा भावे
कवी आला बागेंत तया वेळीं
तया वदलो मग मिळुनि सर्व आम्ही

स्तुती भ्रमराची व्यर्थ करी काव्यीं
तया पुष्पाविण मुळि न सुचे केवी
भ्रमर अमुचा तरि बरा तुम्हापेक्षां
त्यास बुद्धिज्ञानही नसे वाचा
नरश्रेष्ठाचें कृत्य तरी वाचा
तुम्हां कळतां होईल बंद वाचा

O O O

वृत्त कथितां साद्यंत तये तेव्हां
अश्रु आले टपटपा नयनिं आम्हां
विविध चित्रें झरझरा पुढें आली
विविध चरिती–मालिका पुढें आली

O O O

रामराजाचें स्मरण तदा झालें
सती त्यागाचें चित्र पुढें आलें
सती जानकी टाकिली कशी रामें ?
जरी होती प्रियतमा जिवेंभावें
जिच्याकरितां आलिंगी राम वृक्षा
जिच्याकरितां आलिंगी भ्रातृवक्षा
जिच्याकरितां धुंडिली सकल रानें
कशी त्यजिली लोकार्थ सितारामे
जिचें पावित्र्यहि जगन्मान्य होतें
जिला सारें जग मान देत होते

नाश व्हाया पातके सकल जीतें
पंचकन्यीं नित लोक स्मरत होते
अशी असतां लोकांस रंजवाया
राजकर्तव्या सत्य जागवांया
प्रिया जानकि त्यागि तो रामचंद्र
प्रेमपात्रातें दिला अर्धचंद्र
वदे लक्ष्मण हे "योग्य नव्हे ताता
सिता त्यजणें ना मान्य कुणा चित्ता
राम बोले मज मान्य कुठें त्याग
प्रजेसाठीं परि योग्य प्रेम याग
प्रजा करणें संतुष्ट नृपा भाग
प्रजेकरितां प्राणही अल्प याग
प्रजेकरितां जानकी प्रिया त्याग
योग्य आर्या राजास सर्व त्याग
प्रजा चुरडो वा नाश पूर्ण पावो
'सुखी आम्ही' मग कांहि कुणा होवो
अनार्यांचें हें तत्त्व राम बोले
आर्य राजा यासी न मान डोले
जरी सीता ठेवाल तुम्ही आतां
प्राण माझे जातील इथें आतां
'राम' किंवा 'जानकी' इथें राही
उभय वस्तू ना शक्य एक ठायीं
वदुनि ऐसें निश्वास राम टाकी
अश्रुनिर्झर वाहती एकमेकी

कमल नुमले, निस्तेज चंद्र झाला
ग्रहण आलें सूर्यास भास झाला
लुप्त झाला कीं, तारका प्रकाश
पळुनि गेला कीं, कुठें कमल वास
अयोध्येची जणु श्रीच नष्ट झाली
असें सकला भासलें तया वेळीं
लोकरंजन कर्तव्य तेच केलें
प्रेम संन्यासा मान्य मुळि न केले
कुठें संस्कृति थोर जे आर्य त्याची
कुठें संस्कृति तैशीच अनार्याची
जरि करितां रामही पदन्यास
तरी कोणी निंदिती मुळि न त्यास
सती–जानकी सत्शील तरी होती
इथें शीलीं पूज्यता दिसत होती
संशयानें टाकिली सिता आर्यें
स्पष्ट झाली परि इथें स्फोट कार्यें
तरी प्रेमाचा पाश सुटत नाहीं !
संस्कृतीचा परिणाम हाच कांहीं !
कुठें आर्यीं राज्यार्थ प्रेमन्यास
कुठें यांचा प्रेमार्थ पदन्यास
लोकरंजनि रामास साच मान
रामराज्या तुकवी न कोण मान ?
चित्र दुसरें तत्काल पुढें आलें
भीष्मदेवाचें कार्य मनीं आलें

शंतनूच्या आज्ञेस मान द्यावा
म्हणुनि भीष्में सोडिली प्रिया जाया
ब्रह्मचर्या आजन्म पाळि थोर
अशा निस्वार्थी मानी न कोण थोर
धन्य त्यांची हो माय खरी लोकीं
पुरुष ऐसे होतात वंद्य ना कीं
कुठें नृपती राज्यार्थ बंधु नाश
कुठें भीष्माचा जनकार्थ स्वार्थ नाश
अशी चित्रीं पाहतां विविधता ती
'संस्कृतीचा परिणाम शब्द येती'
बंधुप्रीती यवनेश जो तयाची
प्राप्त व्हाया अधिकार थोर, साची !
भरत सोडी राज्यास राम पायीं
वधी बंधू यवनेश राज्य-पायीं
त्याग केला 'रामार्थ' भरत राये
त्याग केला 'रामार्थ' आज राये
उभय रामामधि भेद मनीं आणा
संस्कृतीचा परिणाम ओळखा ना !
केश कुरळें गालही गुलाबाचें
फूल ऐसें हस्तांत गुलाबाचें
यदा पडतां सोडील दुजा कोण ?
शिवा वांचुनि सत्कर्म करी कोण ?
अशीं सुंदर जननीच मदिय व्हावी
हीच इच्छा शिववाणि जगा दावी
साडिचोळी देऊनि बोळवा हो

भगिनि माझी पोंचवा घराला हो !
कुठे ऐसे सग्दुणी पुत्र देवा !
कुठें नरकांतिल किडे हेंच देवा !
अशी चित्रें नृपतिची येत चित्तीं
संस्कृतीचा परिणाम दावितातीं
थोर ऐशी संस्कृती निंदूनीया
नीच ऐशी संस्कृती वंदुनीया
किती गाणीं गाणार परांची हो
मला सांगा, इत्यर्थ यातला हो !
विविध चित्रें पाहुनी मला सांगा
द्याल कोणा अंतरी तुम्ही जागा
सत्यमार्गी लावुनी दृष्टि कोण
संस्कृतीनें मज वदा थोर कोण ?





## ( २७ ) तुळना

भव्य ऐसे गगन तूंही
क्षुद्र तारा एक मी
उदधि असली थोर तूंही
वारिधारा एक मी
मधुर गमसी गान तूंही
तान त्याची एक मी
सर्व ऋतुचा नाथ तूंही
कुसुम आहे एक मी
करुणमय तूं जलधि आहे
मीन आहे एक मी
माणिकाची खाण तूंही
दगड आहे एक मी
मी तुझा हें समज माते
देई शांती मानसी
सोडुनीया त्या दयाला
शरण कोणा जाऊ मी
कमल उमले क्षण भरी का
सूर्य नसतां अंबरी
तेवि नसतां साह्य तूझें
राहूं कैसा येथ मी



# ( २८ ) फुलाचें मागणें

सुंदरीच्या मस्तकीही जाऊनीया गुंतणें
व्यर्थ हो माझे जिणें
प्रेममाला गुंफुनीया प्रेयसीच्या घालणें
व्यर्थ हो माझे जिणें
थोर नृपती होय जो का कंठि त्यांच्या राहणें
व्यर्थ हो माझे जिणें
ईश्वराच्या शीर्षी बसुनी भक्तिभावे शोभणें
व्यर्थ ना माझे जिणें
तोडोनिया बागवाना, मार्गि ऐशा फेकणें
विनति माझी ऐकणें
वीर जाती ज्या सुमार्गें प्राण द्याया आपुले
पंथी ऐशा फेकणें
पायीं तुडवो मार्गि जाता, वीर गाणी गायनें
व्यर्थ ना माझे जिणें
ही मनीषा पूर्ण भरुनी, रोमरोमीं खेळणें
हेंच देवा मागणें



## ( २९ ) थोर कोण ?

वभवानें फुगुनि जाती
नीच म्हणती त्यास ही
फुगुनि जातो क्षुद्र ओढा
पूर येतां क्षणभरीं
सूज्ञता ही काय त्याची
नीच म्हणती त्यासही
होय जगतीं संपदाही
दो दिसाची सांवली
तत्त्व विसरे जो जगीं हें
नीच म्हणती त्यास ही
सूर्य उगवे अंबरी ही
सौख्य देई सृष्टिला
उच्चपदिंही तोच येतां
सज्जना दे तापही
सुफल येती तरुवरांना
नम्रता ना सोडिती
जलद तोही उदक भारे
शीघ्र येतो खालती
भाग्यकालीं नम्र होतो
थोर म्हणती त्यासही
खूण जोकां थोर त्याची
हीच आहे साच कीं
बालपणिंचा तो सुदामा

मित्र होता रंकही
कृष्ण सदनीं सहज येतां
पूज्य झाला थोरही
नयनि येति अश्रु तेव्हां
एकमेकां दर्शनें
कृष्ण हृदयीं त्यास लावी
थोर म्हणती त्यासही
न्हाऊ घाली त्या सुदामा
कृष्ण जाया तेधवा
कृष्ण चोळी पाठ त्याची
थोर म्हणती त्यासही
रंक होता तो सुदामा
राव होता कृष्णही
मान केला मित्र म्हणुनी
स्वर्णपुरीही देउनी
बोध घ्यावा हा जनानीं
संपदा ज्या लाभली
अतिथी येवो सदनि कोणी
मान द्यावा त्यासही
देव धरित्या उत्तमाते
आदरानें मस्तकीं
वैभवानें चढुनि जाती
नीचता ये त्यास कीं



## ( ३० ) प्रणाम

( चाल :–चंद्रकांत राजाची )

वंगदेशिच्या पंचप्राणा ! प्रणाम घे आतां
देशासाठीं प्राण टाकिले धन्य मायपूता
जीवन सारे व्यतीत केलें देशास्तवभारी
कष्ट जाहले सुभाष तुजला जनता अपकारी
मोल न ज्यांना तुझें वाटलें दुर्दैवी खल तें
दुर्बल त्यांचें मानस गमते, लाज न त्या वाटे
सौख्य काय तें संसाराचें ठावे ना तुजला
धन्य सुपुत्रा देशासाठीं ओवाळी तनुला
क्रांतीकारक म्हणुनी तुजला दोष काक देतीं
हंसाचें ना सौख्य पहावें कुटिलाची नीती
देशासाठीं तळमळ म्हणुनी चळवळ तूं केली
मातापितरा सोडुनी विपदां देशास्तव झेली
सावरकर तुज बंधु शोभतो देश जया प्राण
चळवळ केली देशाकरितां वाहुनिया आण
रात्रंदिन तव देह तळमळे शांत न ये झोंप
काय करावें देशाकरितां ध्यास सदा हाच
देश सोडुनी गुप्त जाहला कुटिला ना कळलें
तळमळ खळबळ उडवी हृदयीं नवल पहा घडले
" सत्यासाठीं देशासाठीं धरितां अभिमान
मान तयाचा होतो सुजनी, खलजनिं अपमान
'माय भगिनि तें पळवूं आम्ही' मौन तुम्ही धरणें
गुलाम आमुचें आम्ही नाचवूं नाच तसा करणें

अन्यायानें माता भगिनी बंधु करूं ठार
नग्न सतींना करूत आम्ही भरवूं बाजार
घरें लुटूनीं दिवसाढवळ्या करुन अपमान
मान न देतां दुष्कृत्याला कापुं सुखें मान
अन्यायाची अघोर कर्मे कालसर्प करिती
गरुड तयांचा बनलासी तूं बंधन तुज करिती
कर्ण असूनी बधिर राहणें दृष्टि असुनिया अंध
मदांध वदति बना असे हो, उरला ना बंध
अन्यायाची गुंफी मालिका सुभाषचंद्रा तूं
म्हणून रोषा पावलास बा ! नीच खलांच्या तूं
हिंद देशचे गुलाम सारे साह्य न मज करिती
धांव म्हणोनी घेतलीस बा ! अन्य देशिका तीं
तळमळ मीना परी तुझी ती तेशास्तव होती
म्हणोत कोणी कांहि तुलाही माझी घे प्रणती "
मरणा ते हा भ्याला म्हणुनी आत्मघात केला
म्हणोत कोणी खल कांहींही देशास्तव गेला
तुरी देऊनी हातावरती यवनाधिप त्याच्या
बंध मुक्तता करून घेई बाळ जिजाईचा
भ्याड पळपुटा म्हणती जनता दुर्जन, सज्जनना
कुटिलासंगे कपट करावें यांत पाप तिळना
करी मुक्तता देशाची या बाळ शिवाजी तो
वंदन करिती जनता त्यातें, धन्य म्हणावा तो
सुभाष नच हा दुजा शिवाजी तळमळ देशाची
देशासाठीं राखरांगुळी करी शरीराची

जीवन जगती प्रिय ना कोणा कोण करी हवन
देशासाठीं ओवाळी तनु सुभाष ! तूं धन्य
काक स्पर्श न मरणा आधीं, नको दुर्गती ती
'असे वाटते वीरा जगतीं' योग्य असें रीती
असो कसेंही सुभाषचंद्रा प्रणाम देश करी
तुझ्यासारख्या हुतात्म्यास ना वंदन कोण करी ?
येथें चंद्रा ! तुझा महात्मा तुला हांक मारी
सावरकर हा टाहो फोडी दुःखानें भारी
नेहरू बाळा ! कोण रंजवी देशशून्य भासे
सुभाषचंद्रा ! तुझ्यावांचुनी आम्ही राहूं कसे !
ये, ये, चंद्रा ! आलिंगन दे माता पितरांना
दिसे न नेत्रां वृद्ध जाहलो बोलसि चंद्रा ना
मागें टाकुनी वृद्धांना कां तरुण पुढें गेला
'अर्थ जीवनी तोवरि मरणें वाटे कां बाळा'
काकासम हे दीर्घ राहणें नरकीं राहून
पटे, न तुजला सुभाष बाळा ! गेला कां निघुन
अंधाची या तोल सांवरी कोण आतां बाळा
दया तुला ना आली तिळही, व्याकुळ जिव झाला
'जीवन' होता देशाचा तूं मीन पहा सारे
जीवन नसतां जिवंत राहती काय जीव सारे
अश्रूंची ही माला करुनि हिंद देश वाही
तुझ्या सुचरणीं देव मानुनी स्वीकारी ती ही
भारतमाता सनाथ होती दीन पहा झाली
अनाथ तिजला कोणि न उरला रक्षाया वाली



# ( ३१ ) जीवन

" जीवन म्हणजे सुगंधमयही उदबत्ती आहे "
अर्थपूर्णता किती भरोनी या वाकयीं राहे
देवापुढती जळूं लागला शांत पहा धूप
क्षणाक्षणांनीं कमी कमी हो राख पडे खूप
सुगंध पसरे दिशादिशांना प्रसन्न जग सारे
धूपाच्याही तसे मनाच्या मानसिं मोद भरे
उदबत्तीही जळे परंतु सुगंध दे इतरा
शेवटची ही घटका तीची व्यर्थ न जाय जरा
विझतो केव्हां धूप सुजनहो ! काय कथूं आतां
शरिराची जव पूर्ण राख हो, विझतो पूर्ण तदा
तेजस्वी जो जीवन त्याचें मान्य कुणा नाहीं
हवन करावें इतराकरितां भात्र यातलाही
जळते भरभर परी न होते बारिक टोक तिचे
जळे परी ती विकृत नाहो, काय कथूं वाचें
वनवासाला राम निघाला सीतेसह जेव्हां
निरोप घेती आनंदानें त्रिवर्गही तेव्हां
दामाजीला धरुनि नेले भीति न मरणाची
शिवली तिळही; आस मनीं परि विठ्ठल–चरणाची
लोक–मान्य तें थोर खरोखर हृदयिं किती शांत
कारावासीं सहा अब्दपरि सोशियले कष्ट
गीतेचें जे रहस्य पटले सांगू इतराला
म्हणूनि गीता रहस्य आले जगांत उदयाला
जन्मठेपही शिक्षा कळतां शांति न तिळ ढळली

कडक शासना भीक न घाली क्रूर अशा काळीं
जीवन जगतीं प्रिय ना कोणा कोण करी हवन
देशासाठीं ओवाळी तनु सावरकर धन्य
देहांताची शिक्षा कळतां कंपभरे अंगी
सावरकर परि उत्साहानें उलट भरे अंगीं
देहांताची शिक्षा झाली नाच जसा मोर
करूं लागला नाच तसा तो अनंत हा पोर
सुखदु:खीही समता राहणें विदेही त्या म्हणती
तिथें पाहिजे जातीचें हो शक्य न इतराती
उपवासातें करी महात्मा एकवंश दिनही
हास्य राहिले तसेंच वदनीं अचल मानसी ही
जीवन म्हणजे सुगंधमयही धूप दुजा गमतो
विझतां विझतां सुगंध पसरी धन्य म्हणावा तो
" अर्थ जीवनीं तोंवर मरणीं मौज पहा आहे "
विझतां विझतां सांगे जणुही तत्त्व जगाला हे
धूप निमाला राख पसरली राख न ती चुलिची
मोल पावली जगीं केवढें भाग्यवान साची
मरणें मरती सहस्त्र जगतीं मोल न ये कोणा
राख तयांची तुडविति पायीं कोण पुसे श्वाना
धूपा सम परि जीवन टाकीं राख शिरीं धरितीं
वंदन करिती हुतात्म्यास त्या गाळिति अश्रु किती
वाहत जाते राख कुणाची ओघ जसा वाहे
असंख्य लोका जागृत करिती सत्य राख आहे
जीवन असले जगीं लाभतां कोण अर्पिना सुमनें
सुमनें नमती देवा पुढतीं परि न कदा कुमनें

[redacted] (१२)

दिनांक २६-१-५४ च्या लोकसत्ताक दिनानिमित्त रचलेलें मंगलाष्टक.

**( भारत देशाचें ) मंगलाष्टक ( राग-यमन )**

सम्राटांचें वैभव गेलें, जनतेचें हें अुजळे भाल
धुंद मदांधा सत्ता कुठली त्यांचा आला अंत:काल
फिरवूं नांगर सत्य क्षेत्री, इथें करूं या नंगा नाच
स्वप्नें त्यांची विलया गेलीं देशा आला वैभवकाल
आमिष आम्हां दावा कोणी भुलूं न थोरहि अथवा बाल
भीति न आम्हां अतां कुणाची, मातृ सेवनीं कंठू काळ
समाजवादी, शेकापक्षी, महासभा वा असोत कोणी
संघशक्तिनें नांदू गुंफू राष्ट्र सुतांची एकचि माळ
अभ्रें येतिल लुप्त कराया देशरवीच्या या तेजाला
ऐक्य वायु हा सुटतां अमुचा होतिल अभ्रें सारीं विरळ
स्वार्थ, लालसा, द्वेष घालवूं स्वार्थत्यागें देश भूषवूं
चला वाहु या प्राण आमुचे देशापुढती नमवूं मान
देव असे हा साथी तुमचा सत्कर्मीं जो करि सांभाळ
देशाचें या वैभव वाढो हीच मनीषा असो त्रिकाळ
भारत अमुचा वैभव शिखरी तशी आमची ध्वजाहि शिखरी
फडको फडफड सदैव तेजे, दिपवो जगता अखंड काळ





## (३[illegible]) शारदा वंदन

वीणा करीं दिव्य साजे सदाचा
जिला गायनाचीच गोडी अती
वाल्मीकी नाना कविप्रेम भावें
जिला आळवूनी शिरीं ठेविती
वीणारवानें जिच्या गायकांचा
अहंकार सारा लया पावतो
श्री शारदा ती मनीं आठवूनी
मुदे देव हा वंदितो वंदितो



# ★ शुद्धिपत्र ★

~~~()~~~

| पान | ओळ | चूक | बरोबर |
|---|---|---|---|
| १२ | १ | धनतें | धन तें |
| २० | शेवटची | The last of Rose cummers | The last Rose of summers |
| २४ | २४ | आचार विविधता दोष पुढें "तुला" शब्द हवा | |
| २५ | १८ | ठवा | ठेवा |
| २५ | ५ | सामयता | साम्यता |
| ५४ | १ | वभवानें | वैभवानें |
| ५५ | १८ | अतिथी | अतिथि |
| ५५ | २० | घरित्या | घरि त्या |


~~~

